न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या अंतर्गत असणाऱ्या प्रयोगशाळांमधील विविध विभागांकरीता एकूण ५० पदे बाहय यंत्रणेव्दारे ठोक मानधनावर भरण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक- एफएसएल-०४१७/प्र.क्र.६८/पोल-४,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक :-१० फेब्रुवारी, २०१७.

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.सीबीई-१८९३/प्र.क्र.३८/९३/तेरा, दि.१५.२.१९९५

२) शासन परिपत्रक,वित्त विभाग,क्रमांक -पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/विसु-१, दि.२.२.२०१३.

३) शासन परिपत्रक,वित्त विभाग,क्रमांक -पदनि-२०१३/प्र.क्र.११२/१३/विसु-१, दि.२.१२.२०१३.

४) संचालक,न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय यांचे क्र.मुं.का /१२४७ /१६, दि.२.३.२०१६ चे पत्र.

**शासन निर्णय :-**

महासंचालक (न्यायिक व तांत्रिक) यांच्या अधिनस्त संचालक,न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील प्रयोगशाळेत खालील नमूद प्रयोगशाळा परिचर व सफाईगार या संवर्गातील आवश्यक असणारी एकूण ५० पदे बाहययंत्रणेव्दारे भरण्यास व त्यानुषंगाने येणाऱ्या अंदाजे रु.१.१२ कोटी इतक्या आवर्ती खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| विभाग | पदांचे नांव व पदे | बाहययंत्रणेव्दारे मंजूर केलेले पदे | बाहययंत्रणेव्दारे मंजूर केलेल्या पदांचा अंदाजे खर्च रु. लाखात |
|---|---|---|---|
| **१** | **३** | **४** | **५** |
| **अ)** राज्यातील न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळेतील सायबर क्राइम, टेप ऑथिंटिकेशन व आयडेंटिफिकेशन विभाग | प्रयोगशाळा परिचर- १९<br>सफाईगार-६ | २५ | ६०.०० |
| **ड)** राज्यातील न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळेत नव्याने स्थापन करण्यात येणाऱ्ा डी.एन.ए. विभाग | प्रयोगशाळा परिचर- १७<br>सफाईगार-८ | २५ | ६०.०० |
| **एकूण** | | **५०** | **१२०.००** |

२. सदरची पदे भरतांना उच्चस्तरीय समितीने ज्या पदांची कामे बाहययंत्रणेव्दारे करुन घेण्यास मान्यता दिली आहे, त्या पदांची कामे बाहययंत्रणेव्दारे करुन घेतांना शासन परिपत्रक, वित्त विभाग, दि.२.२.२०१३ व दि.२.१२.२०१३ मधील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर पदे भरण्याबाबत महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी पुढील आवश्यक ती कार्यवाही करावी.

४. हा शासन निर्णय मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.२०.६.२०१६ झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२१०१६०३४९९६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Somnath V Potare

Digitally signed by Somnath V Potare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d677dcd1bc3bed55a48ddbdaad925a6651c5d43a12d84cf305d3ff791ea7f16, cn=Somnath V Potare
Date: 2017.02.10 16:05:40 +05'30'

**( सोमनाथ पोटरे )**

**अवरसचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. महासंचालक (न्यायीक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
६. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
९. उपसंचालक, प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, नागपूर/पुणे/औरंगाबाद/नाशिक/अमरावती/कोल्हापूर/नांदेड,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/पुणे/औरंगाबाद/नाशिक/अमरावती/कोल्हापूर/नांदेड,
११. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१३/१६-ब) मंत्रालय, मुंबई-३२,
१२. वित्त विभाग (व्यय-७/विसु-१) मंत्रालय, मुंबई-३२,
१३. निवडनस्ती/गृह विभाग (पोल-४).